# अनारकोचा तिसरा दिवस

**(तत्वज्ञानाचे दोन क्षण)**

हिंदी - सत्यु

मराठी अनुवाद - मानसी महाजन

आज पहाटे साखरझोपेत असताना अनारकोला जाणवलं की बाबा शेजारी बसून तिच्या डोक्यावरून हात फिरवत आहेत. जाग आली असूनही तिने झोपल्याचे नाटक केले, आणि तिला बाबा सश्यासारखे भासू लागले. एखादा गुबगुबीत ससा शेजारी बसून  हळूच पाय पुढे करून आपल्याला मऊ मऊ स्पर्श करतो आहे असा तिला भास होऊ लागला. मग विचार आला, बाबा पण कसे कसे वाटतात नाही - कधी हत्ती सारखे चालतात, कधी कुत्र्यासारखे गुरगुरतात, कधी बगळ्यासारखे विचारमग्न दिसतात आणि कधी सश्यासारखा मऊ मऊ स्पर्श करतात. मग ती अजून खोल, आतपर्यंत विचार करू लागली. मी सुद्धा अशीच वेगवेगळी वाटत असेन इतरांना. माझ्या आत सुद्धा एक अनारको आहे जी एक गोष्ट करायला सांगते, आणि दुसरी अनारको आहे जी वेगळंच काही करायला सांगते. ठीक, आता काय करावे? मग तिने मनाशी काहीतरी ठरवले. ते ठरवेपर्यंत बाबा निघून गेले होते, म्हणून ती उठली आणि कागद पेन्सिल घेऊन कपाटाजवळ गेली. कपाटातून ल्युडोचा खोका काढला. त्यातला फासा घेतला, कागदावर पेन्सिल ठेवली आणि लिहिले मात्र मनातल्या मनात -

(१) आत्ता जाऊन काटेसावरीखाली बसेन

(२) आत्ता तोंड धुवून शाळेचा अभ्यास करेन

(३) आत्ता गोलूशी भांडण मिटवून पुन्हा बट्टी घेईन

(४) आत्ता किंकूच्या घरी जाऊन काल पकडून बाटलीत ठेवलेलं गांडूळ काय करतं आहे हे बघेन

(५) आत्ता घरातून पळून जाईन

(६) आत्ता भांडी घासायला आईला मदत करेन

मग तिने फासा डब्यात घालून डबा जोरजोरात हलवला आणि डबा वाकडा करून फासा जमिनीवर टाकला. तो बापडा तोल सावरत सावरत गोल फिरत ५ वर जाऊन थांबला. अनारको दचकली. तिने ल्युडो कपाटात ठेऊन दिला, एकदा दोन्ही बाजूला नजर टाकली आणि निघाली घरातून. किंकुच्या घराच्या दिशेने धावू लागली. अनारको घरातून पळून चालली होती!

किंकुच्या घराच्या दाराजवळ जाता जाता अनारकोला किंकु खिडकीतून ओझरता दिसला. म्हणून ती खिडकीजवळ गेली. चवड्यांवर उभे राहून मान उंच करून आत डोकावून पाहते तर काय! किंकु साहेब जमिनीवर फतकल मारून बसले आहेत, भिंतीकडे तोंड करून! अनारकोला समजले, किंकुला सकाळी सकाळी काहीतरी शिक्षा मिळालेली दिसते! हू ह ह! ही पण काय शिक्षा आहे? काहीही शिक्षा शोधून काढतात लोक! शिक्षा अशी हवी की कितीही इच्छा झाली तरी करीम काकांच्या बेकरी बाहेर उभे राहून तो बिस्किटांचा वास घेता येऊ नये, किंवा वाळूतला दगड उचलला की त्याच्या खालच्या गार गार बाजूला गाल टेकवता येऊ नये, किंवा रस्त्यावरून जाताना सायकलच्या चाकांचा चूं इ चूं इ चूं इ असा आवाज ऐकता येऊ नये.

हळू हळू अनारकोला फार जोरात राग येऊ लागला - आत्ता, या क्षणी, ताबडतोब! खूप प्रयत्नाने तिने तिचा राग गिळून टाकला आणि हळूच किंकुला म्हणाली, "किंकु, चल पळून जाऊ." किंकुला कदाचित नीट ऐकू आलं नाही, किंवा ऐकू आलं पण नीटसं समजलं नाही.

किंकु हळू, पण जरा मोठ्यानेच म्हणाला, "काय?" अनारको हळू आवाजात, सावकाश पण स्पष्टपणे म्हणाली, "मी घरून पळून चालली आहे, तू पण चल माझ्याबरोबर. " तिचं पूर्ण बोलणं ऐकायच्या आधीच किंकु उडी मारून खिडकीपाशी आला. खिडकीचे गज वाकडे करून त्यातून अंग चोरून बाहेर आला आणि त्याने जमिनीवर धपकन उडी मारली. हे सगळं इतकं पटकन घडलं, की काय झालं, कसं झालं हे अनारकोला समजायच्या आत किंकु तिच्या समोर तिच्या गळ्याभोवती हात टाकून नाचत होता. काही सुधरायचा आत किंकुने तिच्या गालावर एक पापी सुद्धा दिली होती. समजणं उमजणं सगळं सोडून आता अनारको निव्वळ खुश झाली. दोघे मागच्या कुंपणाकडे निघाले. कुंपणाखालून एका मागोमाग एक बाहेर पडले आणि नाल्यावरून उडी टाकून रस्त्यावर आले. एक मोठा श्वास घेऊन किंकु आणि अनारको पुढे निघाले.

एवढ्यात समोर गोलूचे बाबा दिसले. घरासमोर सावलीत  खाटेवर पंख्याने वारा घेत पडले होते. त्यांनी हाक मारली, "काय रे पोरांनो, कुठे निघाला?" अनारको पटकन खोटं बोलून गेली, "बाजारात चाललो आहोत. आईनी बटणं आणायला सांगितले आहे." झालं. गोलूच्या बाबांनी लगेच काम सांगितलं, "बरं, तिकडे देवळात तुमची मावशी असेल. तिला म्हणावं नळ येणार आहे, लवकर येऊन घरात पाणी भर." किंकु आणि अनारको एक साथ वळले आणि पुढे चालू लागले. गोलूचे बाबा पुटपुटत होते, "काय विचित्र मुलं आहेत!" आणि त्यांचा चेहेरा चिंतातुर दिसू लागला. इकडे किंकु आणि अनारकोची वेगळीच बडबड सुरु झाली.

अनारको - हं! जिथे जाऊ तिथे हुकूम ऐकावे लागतात सगळ्यांचे. जरा कुठे मुलं दिसली, लागले हुकूम सोडायला. आम्हाला ऐकायचं असो व नसो, हे हुकूम सोडणार! मुलं दिसली रे दिसली की हुकूम! जसं आम्हाला काही कामाचं नाही, यांचे हुकूम ऐकत फिरणं सोडून ...

किंकु - स्वतः का नाही पाणी भरत? उठा आणि जा नळाजवळ. स्वतः नाही करणार, आणि सांगणार - जा मावशीला सांग पाणी भरायला. आणि गोलूची आई माझी मावशी कधीपासून झाली?

अनारको  - घरी राहावं तर आईचा हुकूम, बाबांचा हुकूम, घरी आलेल्या पाहुण्यांचा हुकूम, नातेवाईकांचा हुकूम. बाहेर जावं  तर दुकानदाराचा हुकूम, गुरुजींचा हुकूम आणि आता गोलूच्या बाबांचा हुकूम! किंकु, घराच्या आत काय आणि बाहेर काय, सगळं सारखंच आहे रे!

अनारकोने किंकुच्या गळ्यात हात टाकला, आणि किंकु, जो आता शांत झाला होता, रस्त्यावरून पाय आपटत, थप थप आवाज करत चालू लागला. उन्हं चढली होती, पण दोघांना मजा येत होती. पाठीवर ऊन गुदगुल्या करत होतं आणि त्यामुळे सारखी शिरशिरी येत होती.

दोघे मस्त मजेत चालले होते तेवढ्यात त्यांना रस्त्यात मधोमध एक माणूस उभा दिसला. तो त्यांच्याकडे असा काही निरखून पाहत होता जणू त्यांच्या चालण्यात काही दोष असावा. त्या माणसाला कधी पाहिलं तर नव्हतं पण वाटत होतं की पाहिलं असावं. सिगरेटच्या जाहिरातीत, कापडाच्या दुकानात, किंवा भूगोलाच्या पुस्तकात. हा विचार सुरु असतानाच तो माणूस म्हणाला, "कुठे चालला रे पोरांनो?" किंकुने विचार केला, एकदा खोटं बोलून पस्तावलो आहे, त्यामुळे तो म्हणाला, "आम्ही घरून पळून चाललो आहे." खरंच बोलत होता किंकु, पण तो माणूस दचकला. अजून थोडा दचकला असता तर दचकून मागे पडलाच असता. पण एवढा न दचकल्यामुळे सावरून पुढे बोलू लागला, "अरे! का बरं पळून चालले आहेत घरून?" किंकु उत्तरला, "कारण आमचे आई बाबा आम्हाला खूप मारतात." किंकुने पूर्ण सत्य नाही, पण थोडंच खोटं सांगितलं. मात्र हे ऐकून तो चष्मा घातलेला माणूस चांगलाच चक्रावला. म्हणू लागला, "ओह, आई बाबा मारतात होय! मग मुलांनो, तुम्ही पोलीस चौकीत तक्रार करा नाहीतर घरी परत जा. असे पळून जाऊ नका." अनारको आणि किंकुने मिळून त्याच्याकडे धारदार नजर टाकली आणि ताबडतोब खांदे उडवत पुढे निघाले. त्यांचे एकत्र हलणारे खांदे जणू म्हणत होते, "हूँ ह ह ह". जांभळाच्या झाडाखाली बसून दोघे बडबडू लागले.

अनारको - घरी जा नाहीतर पोलीस चौकीत - पोलीस चौकीत जा नाहीतर घरी. म्हणजे कुठे ना कुठे बंद होऊन बसा, सदैव पहाऱ्यात राहा.

किंकु त्या माणसाची नक्कल करत होता - ओह, आई बाबा मारतात होय! हूँ-ह-ह, जसे याने असे कधी ऐकलेच नाही. लहान असताना याने सुद्धा खाल्लाच असेल की मार. आई बाबा मारतात का म्हणे. आणि मारणे म्हणजे तरी काय? माझा गाल नाही माझ्या मनाला मारतात त्याचे काय? ते मारणे नाही का?

अनारकोला समजले, की हा किंकुचा तत्वज्ञानाचा क्षण आहे, म्हणून ती जाणीवपूर्वक शांत बसली.

किंकु - असा किती दिवस मार खायचा! आजोबांचा मार बाबांना मिळाला, आणि त्यांनी तो आपल्याला दिला, जणू सोन्याने भरलेली थैली असावी! हूँ-ह-ह , काय ग अनारको, तुझ्याकडे आठ अणे आहेत?

अनारको - आठ अणे घेऊन काय करणार?

किंकु - चंदू च्या दुकानात जाऊन हलवा खाऊ.

अनारको - पण आठ अणे तर नाहीत.

किकू - मग चल, धन्नाबाबूंच्या शेतातून कैरी तोडून खाऊ.

अनारको आणि किंकु धन्नाबाबूंच्या बागेत घुसणार तेवढयात फाटकातून धन्नाबाबूंचा मुन्शी बाहेर आला. अनारकोला आठवलं की याच मुन्शीने मागच्या वर्षी धन्नाबाबूंच्या तिजोरीतून रुपया चोरला होता - होळी नंतर, गावात दंगल झाली तेव्हा. तर तोच मुन्शी त्यांच्या जवळ येऊन म्हणाला, "काय रे पोरांनो ,सकाळी सकाळी कशासाठी आलात?"

किंकु तोऱ्यात म्हणाला, "आम्ही कैरी तोडायला आलो आहे."

किंकुच्या डोक्यावर अजूनही खरं बोलण्याचं भूत बसलेलं होतं. त्याचं उत्तर ऐकून मुन्शी जणू गाऊ लागले, "कैरी तोडायला आला आहात, चोरायला आला आहात, कैरी चोरायला आला आहात, सकाळी सकाळी कैरी चोरायला आला आहात?" अनारकोला वाटलं मुन्शीचं गाणं कधी बंदच होणार नाही बहुदा. तेवढ्यात ते बंद झालं. मुन्शी जिभेने विचित्र आवाज करत, थुंकी उडवत, हातवारे करत, हलत हलत बोलू लागले, "नाही नाही, चोरी करू नये. चोरी करणं पाप आहे." मुन्शी पुन्हा गाणं सुरु करतील असं अनारको आणि किंकुला वाटलं. "चल इथून निघूया" असं म्हणून दोघे निघाले,आणि चालता चालता स्वतःशी बडबडू लागले.

अनारको - वाह वाह, "सकाळी सकाळी चोरी करायला आला आहात" ? म्हणजे रात्री चोरी केली असती तर ठीक होतं का?

किंकु - मोठे सांगणारे आले चोरी करू नये म्हणून, पाप असतं म्हणे. आणि स्वतः ? स्वतः काय करतात? मागच्या वर्षी चोरी करताना पकडले गेले तेव्हां कसे उंदरासारखे अडकले होते.

अनारको - आमच्याकडे साधे आठ अणे नसावेत चंदू च्या दुकानातून हलवा घेण्यासाठी... आणि जर आम्हाला कशावर तरी दात चालवावेसे वाटले तर आम्ही कैरी चोरणार नाही तर काय करणार?

किंकु - उपदेश देणार आणि स्वतः तसे वागणार मात्र नाहीत. मोठी माणसं किती उपदेश देतात मुलांना! त्यातल्या एका तरी उपदेशाचं पालन स्वतः करतात का? आई म्हणते - खोटं बोलू नये - आणि स्वतः  अनारकोच्या आईला सांगते की आमच्याकडे कोणी शिळी पोळी खात नाही. आणि बाबा उपदेश देतात की कोणाला मारू नये, आणि स्वतः राग आल्यावर आईचे केस धरून तिला थोबाडीत मारतात. नाहीतर वर्तमानपत्र वाचता वाचता चिडचिड करतात, "हे लोक पाकिस्तान वर एकदाचा बॉम्ब का नाही टाकून देत!" म्हणून. बाहेर असो व घरात, नुसते उपदेश - ते ही खोटे!

हा किंकुचा दुसरा तत्वज्ञानाचा क्षण आहे हे अनारकोला समजले, म्हणून ती गप्प बसली. पण तेवढ्यात किंकुची तंद्री भंग झाली होती. तो म्हणाला, "चल अनारको, परत जाऊ. भूक लागली आहे." अनारकोने त्याचा हात धरला आणि दोघे मागे वळले. वळताना सुटलेला हात परत धरला आणि हात हलवत हलवत घराकडे निघाले. वाटेत काटेसावरीचं झाड दिसलं. त्याचा कापूस उडत होता. एक साथ मोठा श्वास सोडून दोघांनी विचार केला, "या झाडात एवढा कापूस येतो तरी कुठून?" आणि दोघे घराकडे जाऊ लागले.

घरी पोहोचता पोहोचता अनारको किंकुला सांगू लागली, "हे बघ किंकु, एक घर, त्याच्या बाहेर एक घर, त्याच्या बाहेर अजून एक घर - घरेच घरे! किंकु, मला तर वाटतं आपण घरातून पळून जाऊच शकत नाही."

किंकुला समजलं, आता अनारकोचा तत्वज्ञानाचा क्षण आला आहे . तो शांत राहून पायाने धूळ उडवू लागला.

बरे, मी तर सांगितलंच नाही की तत्वज्ञानाचा क्षण म्हणजे काय. म्हणजे बघा, खेळता खेळता, धावता पळता, आपण ज्या क्षणी अचानक थांबतो आणि विचार करू लागतो, की ते दूर आकाश, त्यामागे काय असेल - तो आपला

तत्वज्ञानाचा क्षण असतो. हा एक प्रकारचा तत्वज्ञानाचा क्षण झाला. आणि दुसरा? ज्या क्षणी आपण विचार करू लागतो की त्या दूर आकाशापलीकडे काय आहे, आणि त्यात आपण कुठे आहोत, तो दुसरा तत्वज्ञानाचा क्षण असतो!